सैन्य दलातील अपंगत्व प्राप्त झालेल्या अधिकारी/जवानांना आर्थिक मदत देण्याबाबत-श्री.मारोती माधवराव चौरे, जि.परभणी.

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मासैम-२०१५/(प्र.क्र.१८१/१५)/२८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख : १७.०६.२०१५.

**वाचा**

१) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम १०९९/१६६१/प्र.क्र.१२६/९९/२८, दिनांक ०४.१०.२०००

२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६०१९/प्रस्ताव/सैकवि-१६/१६२, दिनांक ३०.०४.२०१५.

## शासन निर्णय

संदर्भाधीन दिनांक ०४.१०.२००० च्या शासन निर्णयाव्दारे जम्मू-काश्मिर मधील नियंत्रण रेषेजवळील क्षेत्रात तसेच देशांतर्गत भागात मे, १९९९ पासून निर्माण झालेल्या युध्दजन्य तणावाच्या परिस्थितीत/चकमकीत/मोहिमेअंतर्गत गंभीररित्या जखमी होऊन अपंगत्व आलेल्या जवानांना त्यांच्या अपंगत्वाच्या प्रमाणानुसार आर्थिक मदत देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी संदर्भाधीन दिनांक ३०.०४.२०१५ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे गंभीररित्या जखमी होऊन अपंगत्व प्राप्त झालेल्या जवानास आर्थिक मदत देण्यास शासन मान्यता देत आहे.

**गंभीररित्या जखमी होऊन अपंगत्व प्राप्त झालेला जवान:**

| अ. क्र. | नाव व पत्ता | दिनांक, मोहिम व अंपगत्वाचे प्रमाण | दिनांक ४.१०.२००० च्या शासन निर्णयानुसार अनुज्ञेय रक्कम |
|---|---|---|---|
| १ | नं. २७९९७५६-वाय, लान्स नायक, श्री. मारोती माधवराव चौरे, गांव - सायळा, पो. केरवाडी, ता. पालम, जि. परभणी. | **०७.०४.२०१४** ऑपरेशन रक्षक (जम्मु-काश्मिर) **४० टक्के** | रुपये १.०० लक्ष |
| | | एकूण | **रुपये १.०० लक्ष** |

२. दिनांक ०४.१०.२००० च्या शासन निर्णयानुसार अनुज्ञेय ठरविलेल्या रु. १,००,०००/- (रुपये एक लक्ष फक्त) रक्कमेपैकी ४० % म्हणजे रु. ४०,०००/- (रुपये चाळीस हजार फक्त) शासकीय अनुदानातून तर उर्वरित ६० % रक्कम म्हणजे रु. ६०,०००/- (रुपये साठ हजार फक्त), मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत गुंतविण्यात आलेल्या रु.२२.२२ कोटी रकमेच्या व्याजातून अदा करण्यात यावी.

३. वरील परिच्छेद क्र.२ मध्ये नमूद शासन अनुदानातून द्यावयाच्या रकमेपोटी होणारा खर्च रु. १,२०,०००/- (रुपये एक लक्ष वीस हजार फक्त) हा मागणी क्र. ए-५ लेखाशीर्ष "२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६० - इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२ - सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतने, (००)(०४) देशांतर्गत सुरक्षासंबंधी मोहिमेत-चकमकीत धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना आर्थिक मदत (२२३५ २६०८) ५० - इतर खर्च " या लेखाशीर्षाखाली सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर रु. ३८,००,०००/- (रुपये अडतीस लक्ष फक्त) इतक्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, परभणी यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच अपंगत्व प्राप्त झालेल्या जवानास द्यावयाची आर्थिक मदत ECS द्वारे देण्यात यावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम१०९९/१६६१/प्र.क्र.१२६/९९/२८, दिनांक ४.१०.२००० मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१७१५३८३०३७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradeep Darade

Digitally signed by Pradeep Darade
DN: CN = Pradeep Darade, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.06.17 15:40:04 +05'30'

(प्र.ल.दराडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२

४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,

५. जिल्हाधिकारी, परभणी,

६. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी,

७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),

८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, परभणी,

९. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई ३२,

१०. नं. २७९९७५६-वाय, लान्स नायक, श्री. मारोती माधवराव चौरे, गांव-सायळा, पो.केरवाडी, ता. पालम, जि. परभणी.

११. निवड नस्ती (२ प्रती).